**कारागृह विभागातील कारागृह शिपाई (Sepoy) गट-क या पदाची भरती प्रक्रिया पोलीस शिपायांच्या भरती प्रक्रियेबरोबर पोलीस विभागामार्फत राबविणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलई-१०१५/१६६६/प्र.क्र.३०२/१५/तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०१५

वाचा : १) गृह विभाग, कारागृह अधिनियम, १८९४ अधिसूचना, दिनांक ३१ जानेवारी २००८ व दिनांक ६ ऑक्टोबर, २०१२.

२) गृह विभाग, मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ आदेश, दिनांक १६ जून, २०११.

**प्रस्तावना** :

महाराष्ट्र राज्यातील पोलीस व कारागृह हे गृह विभागाच्या अखत्यारीतील विभाग आहेत. कारागृह विभागातील कारागृह शिपाई व पोलीस दलातील पोलीस शिपाई ही एकाच वेतन श्रेणीतील समकक्ष पदे असून त्यांच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदी एकसमान आहेत. सेवा भरतीच्या कामात सुसूत्रता, निपक्षपातीपणा आणि समान दर्जा असणे तसेच उमेदवारांना समान संधी व समान न्याय मिळावा यासाठी पोलीस विभागाच्या पोलीस शिपाई या पदाच्या सेवाभरती प्रक्रियेबरोबरच कारागृह शिपाई पदाची भरती प्रक्रिया पोलीस यंत्रणेमार्फत राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

कारागृह विभागामध्ये एकूण चार विभाग असून त्यामध्ये (१) दक्षिण विभाग, मुंबई; (२) पश्चिम विभाग, पुणे; (३) मध्य विभाग, औरंगाबाद; (४) पूर्व विभाग, नागपूर यांचा समावेश आहे.

पोलीस आयुक्तालय, मुंबई, नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद व नागपूर किंवा ग्रामीण पोलीस अधीक्षक, ठाणे, पुणे, औरंगाबाद, नागपूर यांनी ज्या ज्या वेळेस पोलीस भरती घोषित करण्यापूर्वी विभागीय कारागृह उपमहानिरीक्षक हे त्यांचे अधिनस्त कारागृहातील कारागृह शिपायांची रिक्त पदांची व बिंदु नामावलीप्रमाणे बिंदुची माहिती संबंधित पोलीस आयुक्त अथवा पोलीस अधीक्षक यांना कारागृह शिपाई भरती प्रक्रिये कामी देतील. तरी पोलीस विभागाने भरतीची जाहिरात देते वेळी पोलीस विभागाची मागणी नमूद करताना कारागृहाच्या मागणीचा त्या जाहिरातीमध्ये समावेश करावा.

तसेच, कारागृह विभागाच्या रिक्त पदाप्रमाणे जर उमेदवार उपलब्ध झाले नाहीत तर पोलीस विभागातील कट ऑफ लिस्ट नंतर जे उमेदवार कारागृह विभागात कारागृह शिपाई पदावर जाण्यास इच्छूक असतील अशा उमेदवारांचा गुणवत्ते व बिंदु नामावलीप्रमाणे कारागृह शिपाई पदाच्या निवड यादीत समावेश करुन कारागृह विभागास आवश्यकतेप्रमाणे उमेदवार उपलब्ध करुन देतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०७१४४०२८५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jaysing L Pawara

Digitally signed by Jaysing L Pawara
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jaysing L Pawara
Date: 2015.11.07 14:41:50 +05'30'

**( ज. ल. पावरा )**
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.राज्यमंत्री (गृह / शहरे) यांचे खासगी सचिव
४) मा.राज्यमंत्री (गृह / ग्रामीण) यांचे खासगी सचिव
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता ), मुंबई
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), मुंबई
१२) अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण), मुंबई
१३) पोलीस आयुक्त, मुंबई / नवी मुंबई / पुणे / औरंगाबाद / नागपूर
१४) कारागृह महानिरीक्षक, दक्षिण विभाग, मुंबई
१५) कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे / मध्य विभाग, औरंगाबाद / पूर्व विभाग नागपूर
१६) पोलीस अधीक्षक, ठाणे / पुणे / औरंगाबाद / नागपूर
१७) सर्व अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह / जिल्हा कारागृह / खुले कारागृह
१८) निवडनस्ती, तुरुंग-१, गृह विभाग